**महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या. मुंबई यांना शासकीय भाग भांडवल वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.९२/टेक्स-२**
१६ वा माळा, नवीन प्रशासकीय भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०२२

**वाचा :-** १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक:- क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक:- क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक:- क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २८.०१.२०२२
४) महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांचे पत्र क्रमांक ३५८, दिनांक ३०.०७.२०२१.

**प्रस्तावना** :-

राज्यातील सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्षेत्राबाहेरील यंत्रमाग विणकरांना रोजगार उपलब्ध करून देण्यासाठी राज्य शासनाने महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाची स्थापना केलेली आहे. या महामंडळास त्यांचे उत्पादन कार्य राबवण्यासाठी भाग भांडवल देण्याची राज्य शासनाची योजना आहे. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळास शासकीय भाग भांडवल देणेकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता सुधारीत अंदाजान्वये रु.१५०.०० लाख इतकी तरतुद उपलब्ध झालेली आहे. सदर रु. १५०.०० लाख तरतुदीपैकी ६० टक्के म्हणजेच रु. ९०.०० लाख वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळास रु. ९०.०० लाख शासकीय भाग भांडवल वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई या महामंडळाला यंत्रमागावर ग्रे कापड तयार करून घेऊन त्यावर प्रक्रिया करणे, विणकरांना सुत पुरवठा करणे, तयार होणाऱ्या कापडाची विक्री करणे इत्यादी कामासाठी रु.९०.०० लाख शासकीय भाग भांडवल वितरीत करण्यास या आदेशान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग. दिनांक ०१.१२.२०१६ च्या शासन आदेशानुसार महामंडळाकडून करुन घेण्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांची राहील. तसेच महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांनी खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नांवे ECS व्दारे अदा करावी अशा सूचना महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांना या आदेशाव्दारे देण्यात येत आहेत.

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ मधील संबंधीत बाबींची पुर्तता होते.

वरील परिपत्रकातील भाग २ मधील परिच्छेद क्र. ५ च्या अनुषंगाने परिशिष्टातील अ.क्र. १,२,३,४,५,६,७, व ८ या प्रकरणी लागू नाहीत. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला मंजूर करण्यात येणारे शासकीय भाग भांडवल

हे परिशिष्टातील अ.क्र.९ येथील अनुक्रमे “३२-अंशदाने” या बाबीखाली मंजूर करण्यात येते. परिशिष्टातील अ.क्र.९ येथील तपासणी सुचीमधील याप्रकरणी लागु असलेल्या मुद्द्यांची पुर्तता होत असुन त्याबाबतची माहिती खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | मुद्दा | विभागाचे अभिप्राय |
|---|---|---|
| १ | योजनेस प्रशासकीय मान्यता . | होय. सदर योजनेस शासन निर्णय दिनांक ११.०१.१९७२ अन्वये प्रशासकीय मान्यता आहे. |
| २ | निधी वितरण, शासन निर्णयातील अटी व शर्तीची पूर्तता झाल्यानंतरच होणार आहे. | होय. |
| ३ | यापूर्वी वितरीत केलेल्या ७५% निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र. | महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळास मागील वर्षी वितरीत करण्यात आलेल्या संपुर्ण निधी खर्च झालेला असुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केलेले आहे. |
| ४ | यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत. | नाही. |
| ५ | निधी लाभार्थ्यांच्या थेट खात्यात जमा होणार आहे. | होय. |
| ६ | वस्तू खरेदी करण्यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची नोंद Dead Stock रजिस्टरमध्ये घेण्यात आली असून त्याचा योग्य वापर झाला असून त्या पडून नाहीत, याचे प्रमाणपत्र. | याबाबतची पुर्तता करुन घेण्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांची राहील. |
| ७ | यामधून खरेदी होणार असल्यास प्रत्यक्ष वस्तू प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा केले जाणार आहे. | याबाबतची पुर्तता करुन घेण्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांची राहील. |
| ८ | आवश्यक त्या ठिकाणी आदिवासी / सामाजिक न्याय विभाग यांची निधी वितरणास सहमती आहे. | लागू नाही. |
| ९ | प्रस्तुत योजनेत कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. | या योजनेखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. |
| १० | निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे. | होय |

४. या वरील खर्च खालील नमुद लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालु आर्थिक वर्षी (सन २०२१-२२) करीता मंजुर झालेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा :-

"मागणी क्रमांक - व्ही-३
४८५१-ग्रामोद्योग व लघुद्योग यावरील भांडवली खर्च
(००)(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे,.
(००)(०३) महाराष्ट्र राज्य सहकारी यंत्रमाग महामंडळाला भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४८५१००९७)"
३२, अंशदाने

५. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या रक्कमेचे आहरण करून महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांना वितरीत करण्याकरिता श्री. सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. स. दि. खरात, उप सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई -३२ (V०००८) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय मुंबई, येथून आहरीत करून महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्यादित, मुंबई (MAHARASHTRA STATE POWERLOOMS CORPORATION LTD. MUMBAI) यांच्या CANARA BANK, Nerul West, Navi Mumbai - 400 706. A/c no- **50353050000033**, IFSC Code- CNRB0015496, MICR CODE – 400015248 या बँक खात्यावर RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३ दि.१४.१०.२०२१ व दि.२८.०१.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६५/१४३१, दिनांक २३.०३.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९०/२०२२/व्यय-२, दिनांक २९.०३.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०३३११७५६१९४९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

GAURI RAHUL MHASKE

Digitally signed by GAURI RAHUL MHASKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=9e5721a987027f2e238034188d086bb44a9aa24eeb5b83735e1bbb433b57d4ef, pseudonym=9284505F9FF610F2FE668264BFDFCE42DDF9DA61, serialNumber=B018BA858DD6B20CC7A84F6BC86A86D6A6E9AC3AC56C5DBFCD89F36C74DE3E1F, cn=GAURI RAHUL MHASKE
Date: 2022.03.31 17:58:33 +05'30'

**(गौरी रा. म्हस्के)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
२) महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
३) आयुक्त, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
५) कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

६) वित्त विभाग, कार्यासन (व्यय-२)/(सा.ऊ.), मंत्रालय, मुंबई.
७) नियोजन विभाग, कार्यासन (१४३१) मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या., मुंबई.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
१२) सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई.
१३) निवड नस्ती (टेक्स-२).